**महाराष्ट्र शासन**
**क्रमांक - वाहन-१०.०३/प्र.क्र.७२/०३/विनियम**
वित्त विभाग, मंत्रालय,
मुंबई - ४०० ०३२
**दिनांक :- ३ ऑक्टोबर, २००३**

**प्रस्तावना** :- शासकीय वाहन वाटपासंबंधी धोरण ठरविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार विविध पदाधिकारी / अधिकारी यांना त्यांच्या दर्जानुसार योग्य ते वाहन देण्यात यावे, असा निर्णय शासनाने घेतलेला आहे.

**निर्णय**

नवीन शासकीय वाहन / निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहन खरेदी करताना विविध पदाधिकारी / अधिकारी यांना खालील प्रकारचे शासकीय वाहन खरेदी करण्यात यावे, असा निर्णय शासनाने घेतलेला आहे.

| अनु.क्र. | पदाधिकारी / अधिकारी यांची नावे | वाहनांचा प्रकार | किंमत मर्यादा |
|---|---|---|---|
| १ | मा.राज्यपाल | त्यांच्या पसंतीनुसार . | मर्यादा नाही |
| २ | मा.मुख्यमंत्री | --"-- | --"-- |
| ३ | मा.उपमुख्यमंत्री | --"-- | --"-- |
| ४ | मा.मुख्य न्यायमुर्ती, उच्च न्यायालय | --"-- | --"-- |
| ५ | मा.कॅबिनेट मंत्री | केंद्र शासनाच्या दर करारावरील मारुती एस्टीम VX किंवा तत्सम | रु. ६ लाख एकूण |
| ६ | मा.उच्च न्यायालयाचे न्यायाधिश | --"-- | --"-- |
| ७ | मा.राज्यमंत्री | --"-- | --"-- |
| ८ | मा.मुख्य सचिव | --"-- | --"-- |
| ९ | मा.महाअधिवक्ता | --"-- | --"-- |
| १० | मा.अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव व त्या दर्जाचे भा.प्र.सेवातील इतर वरिष्ठ अधिकारी | --"-- | --"-- |
| ११ | सचिव व इतर वाहन अनुज्ञेय असलेले अधिकारी | केंद्र शासनाच्या दर करारावरील | रु. ५ लाख एकूण |

२. वाहन विषयक शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १०.९.२००१ नुसार वाहनांची अनुज्ञेयता राज्य स्तरीय समिती निश्चित करेल. वाहने अनुज्ञेय नसल्यास बदली वाहन / नवीन वाहनांची खरेदी करण्यात येऊ नये.

A:/72.03
रोटा/एच-819(12,500+15-10-03)

(कृ.मा.प.

३. या शासन निर्णयाची अंमलबजावणी या शासन निर्णयाच्या दिनांकापासून करण्यात येईल.

४. वरील शासन निर्णयांअन्वये केलेल्या तरतूदी या शासन निर्णयाच्या दिनांकापासून स्वायत्त संस्था / सार्वजनिक क्षेत्रातील सर्व उपक्रम / मंडळे / महामंडळे यांना लागू करण्यात येत आहे. हे आदेश सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व स्वायत्त संस्था, सार्वजनिक क्षेत्रातील सर्व उपक्रम / मंडळे / महामंडळे यांच्या निदर्शनास तात्काळ आणावेत व त्याची प्रत वित्त विभागास पृष्ठांकित करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(गौ.जो.रसाळ)
उप सचिव, वित्त विभाग

प्रति,

- ◆१. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०
- ◆२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
- ◆३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
- ◆४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
- ५. राज्यपालांचे सचिव
- ६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
- ७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
- ८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
- ९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव
- १०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१
- ११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
- १२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
- १३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
- १४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन,नवी मुंबई
- ◆१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
- ◆१६ प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई
- ◆१७. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान लेखा कार्यालय आवार, मुंबई
- ◆१८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- ◆१९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
- ◆२०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई
- ◆२१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ५१
- २२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
- २३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई /पुणे/ नागपूर/ औरंगाबाद / नाशिक/ अमरावती
- २४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
- २५. सर्व उप कोषागार अधिकारी
- २६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
- २७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग( कार्यासन -हाऊसिंग सेल ,१९ -सी ) मंत्रालय, मुंबई-३२
- २८. सर्व विभागीय आयुक्त
- २९. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
- ३०. सर्व जिल्हाधिकारी
- ३१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
- ३२. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
- ३३. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१
- ३४. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१
- ३५. वित्त विभागातील सर्व कार्यासने
- ३६. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग

◆ पत्राद्वारे.